Blood Cell अंतर्गत हिमोफेलीया व थॅलेसेमिया या आजारावरील औषधे आणीबाणी तत्वावर खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय शुध्दीपत्रक क्रमांकः प्रशामा-०५१८/प्र.क्र.२८४/आरोग्य -७

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ०६ नोव्हेंबर, २०१८.

वाचा :-

१) अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/ हिमॅटॉलॉजी विभाग/आणीबाणी तत्वावर औषध खरेदी/१८, दिनांक २३ मे,२०१८.

२) सार्वजनिक आरोग्य विभाग, समक्रमांक शासन निर्णय दिनांक २६/०६/२०१८.

३) आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र.राआअ/राज्य रक्त कक्ष/शासन निर्णय दुरुस्ती/३९८८९/१८, दिनांक ०७ ऑगस्ट, २०१८.

४) सार्वजनिक आरोग्य विभाग, समक्रमांक शासन निर्णय दिनांक ३१/०८/२०१८.

५) अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र.राआसो/राज्य रक्त कक्ष/शुध्दीपत्रक/५८८१७/१८, दिनांक २१ सप्टेंबर, २०१८.

## शासन निर्णय शुध्दीपत्रक :-

शासनाच्या संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयानूसार Blood Cell अंतर्गत हिमोफेलीया व थॅलेसेमिया या आजारावरील औषधे आणीबाणी तत्वावर खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबतचा निर्गमित करण्यात आलेला शासन निर्णय कायम ठेऊन संदर्भ क्र.४ अन्वये निर्गमित करण्यात आलेला दिनांक ३१/०८/२०१८ चा शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे. संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयानूसार थॅलेसेमिया व हिमोफिलिया ही औषधी खरेदी करण्यास देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता कायम करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १ मधील तक्त्याऐवजी खालील तक्ता अंतर्भूत करण्यात येत आहे. सदरहू तक्त्यातील

औषधांच्या दरामध्ये जीएसटी व इतर सर्व कर अंतर्भूत करण्यात आले असल्याने सदरहू दराने खरेदी केलेल्या औषधीस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| SR. No. | Medicine Name | Unit Rate Including all Taxes (Rs.) | Total Qty. | Total In Rs. | Remark |
|---|---|---|---|---|---|
| 1 | Factor VII / 1mg | 41275.5 / mg | 703 mg | 2,90,16,677/- | ESIC Rate Contract |
| 2 | Factor VIII Vial of 250 IU | 2025.45 / Vial | 8250 Vials | 1,67,09,963/- | |
| 3 | Factor IX Vial of 600 IU | 9012 / Vial | 2172 Vials | 1,95,74,064/- | |
| 4 | FEIBA Vial of 500 IU | 23415 / Vial | 1250 Vials | 2,92,68,750/- | |
| 5 | Tab. Deferasirox – 250 mg | 11.8384 / Tablet | 247750 | 29,32,964/- | DHS Tender Rate |
| 6 | Tab. Deferasirox- 500 mg | 19.4656 / Tablet | 227750 | 44,33,290/- | |
| 7 | Tab. Deferiprone – 250 mg | 4.4 / Tablet | 17250 | 75,900/- | |
| 8 | Tab. Deferiprone – 500 mg | 7.7 /Tablet | 38500 | 2,96,450/- | |
| | **Total in Rs.:- Ten Crores Twenty Three Lakhs Eight Thousand Fifty Eight Only.** | | | **10,23,08,058/-** | |

२. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्या कार्यालयाने संदर्भ क्र.५ अनुसार सादर केलेल्या प्रस्तावानूसार शासनाच्या दिनांक २६/०६/२०१८ च्या शासन निर्णयातील अटी आणि शर्तींच्या अधीन राहून रु.१०.८५ लक्ष एवढया किमतीची सदरहू औषधी हाफकिन बायोफार्मा, मुंबई यांचेकडून प्रशासकीय मान्यतेच्या निधीस अनुसरुन या संदर्भात खरेदी करण्यात आलेल्या औषधांच्या खरेदीस शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201811121325004317 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S. A. Pedgaonkar

Digitally signed by S. A. Pedgaonkar
DN: CN = S. A. Pedgaonkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Social Justice And Special Assistance Department
Date: 2018.11.12 15:28:06 +05'30'

(सु. अ. पेडगांवकर)
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

प्रत,

१. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

२. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
३. अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
४. सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
५. सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
६. उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
७. सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
८. सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
९. अवर सचिव/ कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग.
१०.निवडनस्ती (आरोग्य-७)